**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.२५.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये इतर मागास बहुजन कल्याण विभागाकडे सोपविण्यात आलेल्या “मराठा आरक्षण” या विषयाच्या ऐवजी “मराठा समाजासाठी कल्याणकारी योजना राबविणे” असा बदल करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. मसक-२०२०/प्र.क्र.३५/विजाभज-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १४ मार्च, २०२०

वाचा :- १) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा दि.२५.०६.२०१९ रोजीचा शासन निर्णय क्र. आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.२६४/ आस्था-१
२) सामान्य प्रशासन विभागाची दि.०९.०३.२०१७ रोजीची अधिसूचना क्र.शाकानि-२०१७/प्र.क्र.३३/१८/ (र.व.का.)

प्रस्तावना :-

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.२५.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकूण ०६ विषय बहुजन कल्याण विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आले आहे. त्यामध्ये अ.क्र.१ वर “मराठा आरक्षण” हा विषय अंतर्भूत आहे.

३. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०९.०३.२०१७ रोजीची अधिसूचना क्र.शाकानि-२०१७/ प्र.क्र.३३/ १८/ (र.व.का.)अन्वये शासन कार्यनियमावलीच्या पहिल्या अनुसूचीमध्ये शासन विभाग या शिर्षाखाली नोंद क्रमांक ३१ नंतर “ ३२. विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग” अशी नोंद समाविष्ट करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे पहिल्या अनुसूचीच्या शेवटी विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागास नेमून दिलेले एकूण १६ विषय अंतर्भूत करण्यात आलेले आहेत. सदर १६ विषयांमध्ये मराठा आरक्षण हा विषय अंतर्भूत नाही.

४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.१९.०६.२०१७ रोजीच्या शासन निर्णय क्र. आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.१८८/आस्था-१ सोबतच्या विवरणपत्रामध्ये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडील विषयांची जंत्री कार्यासननिहाय नमूद करण्यात आली आहे. सदर विषयांचे अवलोकन केले असता सामाजिक न्याय विभागातील कोणत्याही कार्यासनाकडे “मराठा आरक्षण” या विषयाचे कामकाज सोपविल्याचे दिसून येत नाही. असे असताना, सामाजिक न्याय विभागाच्या दि.२५.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मराठा आरक्षण

हा विषय बहुजन कल्याण विभागाकडे सोपविण्याचे प्रयोजन स्पष्ट होत नाही. कोणत्याही मागासप्रवर्गातील समाजाच्या आरक्षणाबाबत धोरणात्मक निर्णय सामान्य प्रशासन विभागाकडून घेण्यात येतो. इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे कार्यक्षेत्र हे इमाव, सावशैमाप्र, विजाभज आणि विमाप्रवर्गातील समाजासाठी कल्याणकारी योजना राबविण्याचे आहे. सदर समाजासाठीचे शासकीय नोकऱ्या व शैक्षणिक संस्थांमधील आरक्षणाचा मुद्दा हा सामान्य प्रशासन विभागाशी संबंधित आहे. आरक्षणाच्यासंदर्भात सामान्य प्रशासन विभाग जो धोरणात्मक निर्णय घेईल, त्याप्रमाणे कार्यवाही करण्याची जबाबदार अन्य सर्व प्रशासकीय विभागांची आहे.

५. ही वस्तुस्थिती लक्षात घेता सामाजिक न्याय विभागाच्या दि.२५.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये बहुजन कल्याण विभागाकडे सोपविण्यात आलेल्या "मराठा आरक्षण" या विषयाच्या ऐवजी "मराठा समाजासाठी कल्याणकारी योजना राबविणे" असा बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुषंगाने खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दि.२५.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये बहुजन कल्याण विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आलेल्या एकूण ०६ विषयांपैकी अ.क्र.१ वर नमूद "मराठा आरक्षण" या विषयाच्या ऐवजी मराठा समाजासाठी कल्याणकारी योजना राबविणे" असा बदल करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००३१७१२१७०११२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA VASANTRAO GURAV

Digitally signed by RAVINDRA VASANTRAO GURAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=9dfb7aefbd9e82b129c324d567b46e1d853d93c38d6e222c868eac72ecd12784, ou=VJNT OBC AND SBC DEPT, o=GOVERNEMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA VASANTRAO GURAV
Date: 2020.03.17 12:19:47 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव.
३) मा.विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

४) मा.मंत्री/राज्यमंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५) मा.सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
७) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव (सामान्य प्रशासन विभाग) (र.व का.) यांना माहितीसाठी तसेच मंत्रालयीन विभागांस नेमून दिलेल्या विषयसूचीमध्ये आवश्यक ती सुधारणा करण्याबाबत.
८) अध्यक्ष, उपाध्यक्ष/ व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासर्गीय वित्त आणि विकास आर्थिक महामंडळ,मुंबई.
९) मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
१०) आयुक्त, समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य मुंबई.
११) सह सचिव/ उप सचिव (महामंडळ) सामाकि न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, कोकण भवन, नवी मुंबई (दोन प्रती)
१३) महालेखापाल(ले.व.अ.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर.
१४) महालेखापाल (ले.प.) १ व २, मुंबई/नागपूर .
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई/ ठाणे .
१६) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१७) वित्त विभाग (का-व्यव-१४/अर्थोपाय/ अर्थसंकल्प-३/ साउ) मंत्रालय, मुंबई.
१८) नियोजन विभाग (का, १४१३)मंत्रालय, मुंबई.
१९) सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई .
२०) सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासर्गीय वित्त आणि विकास आर्थिक महामंडळ,मुंबई (मर्या.)
२१) सर्व व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासर्गीय वित्त आणि विकास आर्थिक महामंडळ,मुंबई (मर्या.)
२२) प्रधान सचिव (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई.
२३) सह सचिव (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई.
२४) निवडनस्ती (विजाभज-१) इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.